**शासनाकडून नागरिकांना पुरवण्यात येणा-या सेवा बद्दल आकारण्यात येणा-या शुल्काचे वाटपा बाबत.**

**महाराष्ट्र शासन शासन**
**निर्णय शासन निर्णय क्रमांक : मातंसं ११०४/प्र.क्र.१११/३९**
**सामान्य प्रशासन विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक २९ एप्रिल २०११**

**वाचा :** शासन निर्णय क्रमांक : मातंसं ११०४/प्र.क्र.१११/३९ महाराष्ट्र शासन सामान्य प्रशासन विभाग, दिनांक - ३ डिसेंबर २००८

भारत सरकारच्या राष्ट्रीय ई-गव्हर्नन्स योजने अंतर्गत सामाईक सेवा केन्द्र (CSC)/महा ई- सेवा केंद्र या योजना राज्य शासना कडून सुरु करण्यात आलेली आहे. नागरिकांना शासकीय,सामाजिक व खाजगी सेवा पुरवण्यासाठी राज्याच्या ग्रामीण तसेच शहरी भागात ११८१८ सामाईक सेवा केंद्रांचे (Common Service Centers) जाळे निर्माण करण्याचा शासनाचा विचार आहे. ही योजना सुरळीतपणे राबवण्यात शासन प्रयत्नशील आहे. त्यासाठी शासनाने मे. टी.सी.एस.(TCS)च्या संयुक्त विद्यमाने महाऑनलाईन लिमीटेड ही कंपनी स्थापन केलेली आहे. या कंपनीच्या कडून विस्तृत असे वेब एनेबल्ड पोर्टल तयार करण्यात येणार आहे आणि त्या माध्यमातून वाहन चालविण्याचा परवाना देणे,वाहनांची नोंदणी करणे ई. सारख्या सेवा नागरिकांना पुरविण्यात येणार आहेत.

शासनाकडून पुरविण्यात येणा-या सुविधांवर आकारण्यात येणा-या शुल्कासंबधी सूचना या पूर्वीच दि. ३ डिसेंबर २००८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार सुविधा पुरविण्याचे शुल्क रु. २० असेल तर त्याचे वाटप खालील प्रमाणे करण्यात येत होते.:-

| वाटपाचे प्रमाण | संस्थेचे नाव |
|---|---|
| रु.५/- | महाऑन्लाईन लिमिटेड |
| १०% ( रू.२ ) | SDA(महाराष्ट्र सेतू) |
| ९०% - ५ रु | सेवा केंद्र चालक संस्था (SCA) आणि गाव पातळी वरील उद्योजक (VLE) |

सामाईक सेवा केन्द्र (CSC)/महा ई- सेवा केंद्र या प्रकल्पामध्ये जिल्हाधिकारी आणि सेतू केंद्राचा सहभाग वाढीस लागावा या दृष्टीकोनातून या पूर्वी शासनाकडून पुरविण्यात येणा-या सुविधावर आकारण्यात येणा-या शुल्काच्या रकमेतून महाऑनलाईन कंपनीला आणि SDA ला देण्यात येणा-या रकमेत कपात करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

या निर्णयानुसार आता सुविधा पुरविण्याचे शुल्क रु. २० असेल तर त्याचे वाटप खालील प्रमाणे करण्यात येईल

| वाटपाचे प्रमाण | संस्थेचे नाव |
|---|---|
| रु.४/- | महाऑन्लाईन लिमिटेड |
| १०% -१ रु | SDA(महाराष्ट्र सेतू) |
| ९०% - ५ रु | सेवा केंद्र चालक संस्था (SCA) आणि गाव पातळी वरील उद्योजक (VLE) |
| रु.२/- | जिल्हा सेतू सोसायटी |

सेवा केंद्र चालक संस्था (SCA) आणि गाव पातळी वरील उद्योजक (VLE) यांना देण्यात येणा-या रकमेतील जास्तीत जास्त वाटा VLE ला मिळेल याची काळजी SCA घेईल.

उत्पन्नाचा आढावा राज्य शासनाकडून नियमीत पणे घेण्यात येईल आणि त्या नुसार उत्पन्नानाच्या वाटपाचे प्रमाण ठरविण्यात येईल.

VLE च्या वाट्याची रक्कम जमा करण्या साठी स्वतंत्र खाते उघडण्यात यावे. हे खाते SCA ने उघडून द्यावे. त्याकरिता सन२०११-१२ या वर्षा साठी रु.५०० /- नोंदणी शुल्क राहील. सन २०१२-१३ आणि सन २०१३-१४ प्रत्येकी साठी रु.२५०/- नोंदणी शुल्क राहील. ज्या VLE नी ऑनलाईन मॉनिटरिंग टूल द्वारे नोंदणी केलेली असेल फक्त त्यांनाच महाऑनलाईन च्या माध्यमातून सेवा पुरवण्याची परवानगी देण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५०४११५१४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(विजयालक्ष्मी बिदरी - प्रसन्ना)
संचालक तथा उप सचिव
( माहिती तंत्रज्ञान)
महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व विधान सभा/ विधान परिषद सदस्य
मा. राज्यपाल याचे सचिव
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
निवड नस्ती